**सन २०१६-१७ च्या टंचाई कालावधीसाठी पाणी टंचाई कार्यक्रमांतर्गत मलकापूर तालुक्यातील प्रादेशिक पाणी पुरवठा योजनांची विशेष दुरुस्ती करण्याच्या प्रस्तावांस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०१७/प्र.क्र. ६ /पापु १४

जी. टी. रुग्णालय संकुल, ७ वा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: २४ मार्च, २०१७

**वाचा -**

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई १०९९/प्र.क्र. १२/पापु १४, दिनांक ३.२. १९९९
२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई २०१६/प्र.क्र. १४३/पापु १४, दिनांक ४.५.२०१६
३) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे क्रमांक उपसा/विकास/पाणी टंचाई /अका कावि/४८०/१७, दिनांक २२.०३.२०१७ चे पत्र व प्रस्ताव
४) जिल्हाधिकारी, बुलढाणा यांचे क्रमांक पाणी टंचाई/कावि/९३/२०१७, दिनांक २१.०३.२०१७ चे पत्र व प्रस्ताव
५) शासन पत्र क्रमांक टंचाई २०१७/प्र.क्र. ३७/पापु १४, दिनांक २४ मार्च, २०१७ (बैठकीचे इतिवृत्त)

**प्रस्तावना -**

विभागीय आयुक्त, अमरावती यांनी सन २०१६-१७ च्या टंचाई कालावधीसाठी पाणी टंचाई कार्यक्रमांतर्गत मलकापुर तालुक्यातील दुधलगाव खु. २२ गावे प्रादेशिक पाणी पुरवठा योजना, दाताळा १५ गावे प्रादेशिक पाणी पुरवठा योजना, मोरखेड १० गावे प्रादेशिक पाणी पुरवठा योजनांची विशेष दुरुस्तीसाठी अनुक्रमे, रुपये ७५६.०८ लाख, रुपये ४९४.४५ लाख व रुपये ३७९.२७ लाख याप्रमाणे एकूण रुपये १६२९.८० लाख इतक्या किमंतीच्या प्रस्तावांस प्रशासकीय मंजूरी मिळण्याबाबत प्रस्ताव शासनास सादर केला होता. सदर प्रस्ताव सचिव स्तरीय स्थायी समितीच्या दिनांक २३ मार्च, २०१७ रोजी झालेल्या बैठकीत मान्यतेसाठी विचारात घेण्यात आला होता.

विभागीय आयुक्त, अमरावती यांच्याकडून प्राप्त मलकापुर तालुक्यातील उपरोक्त नमुद तीनही (३) प्रादेशिक पाणी पुरवठा योजनांच्या विशेष दुरुस्तीच्या उपाययोजनेबाबतचा एकूण रुपये १६२९.८० लाख इतक्या किमंतीच्या प्रस्तावांवर दि. २३ मार्च, २०१७ रोजीच्या स्थायी समितीच्या बैठकीत सविस्तर चर्चा होऊन त्यामधील प्रशासकीय /पर्यवेक्षीय इत्यादी शुल्क वगळून एकूण १५६७.१३ लाख इतक्या किमंतीच्या प्रस्तावास स्थायी समितीने मंजूरी दिली. त्या अनुषंगाने सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

विभागीय आयुक्त, अमरावती यांनी मलकापुर तालुक्यातील दुधलगाव खु व २२ गावे प्रादेशिक पाणी पुरवठा योजना, दाताळा १५ गावे प्रादेशिक पाणी पुरवठा योजना, मोरखेड १० गावे प्रादेशिक पाणी पुरवठा योजनांच्या विशेष दुरुस्तीच्या उपाययोजनेबाबतचा एकूण रुपये १६२९.८०लाख किमंतीचा प्रस्ताव संदर्भ क्र. ३ च्या पत्रासोबत शासनास सादर केलेला आहे. सदर प्रस्तावात नमूद केलेल्या कामांचा समावेश असलेल्या आणि खाली तक्यात दर्शविल्याप्रमाणे प्रशासकीय व पर्यवेक्षीय शुल्क वगळून रुपये १५६७.१३ लाख ( रुपये पंधरा कोटी सदुसष्ट लाख तेरा हजार फक्त) किंमतीच्या प्रस्तावास सचिव स्तरीय स्थायी समितीने दिनांक २३ मार्च,२०१७ च्या बैठकीत मान्यता दिलेली आहे.

| अ.क्र | योजनेचे नांव | सादर केलेल्या प्रस्तावाची किंमत ( रुपये लाखात) | मान्यता दिल्याप्रमाणे प्रस्तावाची किंमत ( रुपये लाखात ) |
|---|---|---|---|
| १ | दुधलगाव खु व २२ गावे प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेची विशेष दुरुस्ती | ७५६.०८ | ७२७.०० |
| २ | दाताळा १५ गावे प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेची विशेष दुरुस्ती | ४९४.४५ | ४७५.४४ |
| ३ | दाताळा १५ गावे प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेची विशेष दुरुस्ती | ३७९.२७ | ३६४.६९ |
| | एकूण | १६२९.८० | १५६७.१३ |

त्या अनुषंगाने या आदेशान्वये सदर प्रस्तावास खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकिय मान्यता देण्यात येत आहे :-

१) जिल्हाधिकारी, बुलढाणा यांनी मलकापुर तालुक्यात संबंधित प्रादेशिक पाणी पुरवठा योजनांच्या क्षेत्रात पिण्याच्या पाण्याची टंचाई निर्माण झाली असल्याचे सर्व प्रथम घोषित करणे.

२) सदर प्रादेशिक पाणी पुरवठा योजनांची विशेष दुरुस्तीची कामे कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, बुलढाणा यांनी करणे आवश्यक राहील. तसेच योजनांची अंमलबजावणी जिल्हा परिषद, बुलढाणा यांच्यामार्फत करण्यात यावी.

३) सदर योजनेचे काम प्रस्तावात नमूद केल्याप्रमाणे टंचाई कालावधीच्या आत तातडीने पूर्ण करावे अन्यथा योजनेची मान्यता आपोआपच व्यपगत होईल.

४) सदर योजनेच्या किंमती एवढे रुपये १५६७.१३ लाख इतके अनुदान शासनाद्वारे उपलब्ध करुन दिले जाईल.

५) विभागीय आयुक्त, अमरावती यांनी सदर योजनांकरिता योजनांच्या कामाच्या सुरुवातीस ५०% इतका निधी द्यावा. उर्वरित ५०% निधी योजना कार्यान्वित झाल्यानंतर देण्यात यावा.

६) सदर योजनेची प्रस्तावात नमूद कामे जिल्हा परिषद,बुलढाणा मार्फत पूर्ण करण्यात आल्यानंतर योजनेची देखभाल दुरुस्ती व योजनेचे व्यवस्थापन संबंधित ग्रामपंचायत मार्फत करणे आवश्यक राहील.

२. याबाबत होणारा खर्च मागणी क्र. सी-६, २२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०१- अवर्षण, १०२ पिण्याच्या पाण्याचा पुरवठा, ९१ - राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१)(०१) पिण्याच्या पाण्याच्या आकस्मिक निकडीच्या पुरवठा (२२४५००९३) (दत्तमत) (वेतनेत्तर) - ३१, सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखालील तरतूदीमधून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ नागरी व ग्रामीण क्षेत्रातील विहित आर्थिक व भौतिक निकषाबाहेरील तात्पुरत्या पाणी पुरवठा योजना / उपाययोजनांना प्रशासकीय मंजूरी देण्यासाठी सचिवस्तरीय स्थायी समिती स्थापन केली असून सदर समितीच्या दिनांक २३/३/२०१७ रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२४१५५५३३८९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahesh Bhagwan Sawant

Digitally signed by Mahesh Bhagwan Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d1f670a17d77c8ddff69694de2a07b7ff855dafef954aefa82ca28bd6cc6adb6, cn=Mahesh Bhagwan Sawant
Date: 2017.03.24 16:44:55 +05'30'

**(म. भ. सावंत)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई

२. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर
३. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, (म.व पु.) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, नवी मुंबई
८. विभागीय आयुक्त, अमरावती
९. जिल्हाधिकारी,बुलढाणा
१०.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,बुलढाणा
११. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अमरावती
१२. अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अमरावती
१३.कार्यकारी अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,बुलढाणा
१४.कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद,बुलढाणा
१५. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक
१६.उप सचिव (पापु १४) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक
१७.पापु १४ (निवडनस्ती)